"राज्यात जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शनाच्या आयोजनाकरीता जाहिरात व प्रसिध्दी योजने अंतर्गत सन २०१८-१९ ते २०२२-२३ या कालावधीसाठी संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांना दरवर्षी रु. २५.०० लाख इतके अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याबाबतच्या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत."

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः हातमाग-२०१८/२४६/प्र.क्र.१०९/टेक्स-३**

नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ जानेवारी, २०१९

**वाचा :**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८

२) शासन पत्र, वित्त विभाग क्र. शासाउ १०.१८/प्र.क्र.४८/सा.उ., दिनांक २० एप्रिल, २०१८

३) संचालक वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कार्या-२(३)/क-२०/३२८६/ २०१८, दिनांक ३० मे, २०१८

**प्रस्तावना :**

हातमाग उत्पादनाला विस्तृत प्रमाणात प्रसिध्दी मिळून हातमाग कापडाच्या विक्रीमध्ये वाढ व्हावी जेणेकरुन हातमाग विणकरांना सातत्याने रोजगार उपलब्ध व्हावे या उद्देशाने केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय हातमाग विकास कार्यक्रम (National Handloom Development Programme) योजने अंतर्गत ना नफा ना तोटा या तत्वावर अनेक ठिकाणी वेगवेगळया स्तरावरील हातमाग कापड प्रदर्शनाचे आयोजन केले जाते. राज्यातील हातमाग विणकरांना सदर योजनेचा लाभ व्हावा व राज्यात उत्पादित होणा-या वाणाला आवश्यक प्रसिध्दी मिळावी व त्याद्वारे गरीब हातमाग विणकरांच्या कुटूंबाच्या उदरनिर्वाहास हातभार लागावा या उद्देशाने हातमागाच्या प्रदर्शनासाठी राज्य शासनाकडून जाहिराती व प्रसिध्दी योजने अंतर्गत अर्थसहाय्य देण्यात येते.

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय हातमाग विकास कार्यक्रम (National Handloom Development Programme) योजनेअंतर्गत सन २०१५-१६ पर्यंत राष्ट्रीय व राज्यस्तरीय प्रदर्शनासह जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शनेही आयोजित करण्यात आलेली आहेत. तथापि सन २०१६-१७ पासून केंद्र शासनाने जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शनाच्या आयोजनासाठी मंजूरी प्रदान केली नसल्याने मागील दोन वर्षापासून राज्यात जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शने आयोजित करता आली नाहीत. त्यामुळे हातमाग विणकरांची हलाखीची परिस्थिती लक्षात घेऊन त्यांच्या हाताला काम मिळावे व त्यांनी उत्पादित केलेल्या वाणाला प्रसिध्दी मिळावी तसेच त्यांच्या मालाची विक्री होऊन त्यांच्या उदरनिर्वाहास हातभार लागावा या उद्देशाने संचालक वस्त्रोद्योग, नागपूर यांच्या संदर्भाधीन क्र. ३) येथील दिनांक ३० मे, २०१८ च्या पत्रान्वये प्राप्त प्रस्तावानुसार सन २०१८-१९ ते २०२२-२३

या कालावधीसाठी प्रत्येक वर्षासाठी पाच जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शने आयोजित करण्यासाठी प्रति प्रदर्शन रु.५.०० लाख याप्रमाणे प्रत्येक वर्षी रु.२५.०० लाख इतका निधी संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यात जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शनाच्या आयोजनाकरीता सन २०१८-१९ ते २०२२-२३ या कालावधीसाठी प्रत्येक वर्षासाठी पाच जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शने आयोजित करण्यासाठी प्रति प्रदर्शन रु. ५.०० लाख याप्रमाणे प्रत्येक वर्षी रु. २५.०० लाख (रु. पंचवीस लाख फक्त) इतका निधी संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना “मागणी क्र. व्ही-२” अंतर्गत ‘२८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग खालील ११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना अर्थसहाय्य, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२८५१ ०११९), २६, जाहिरात व प्रसिध्दी’ या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करुन देण्याबाबतच्या योजनेस सदर शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेंतर्गत प्राप्त होणारा रु. २५.०० लाख (रु. पंचवीस लाख फक्त) इतका निधी संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर व महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स), मुंबई या संस्थांना जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शनांच्या आयोजनासाठी प्रति प्रदर्शन रु. ५.०० लाख (रु. पाच लाख फक्त) याप्रमाणे मागणीनुसार व आवश्यकतेनुसार खालील अटींच्या अधीन राहून उपलब्ध करुन द्यावा.

१) उपरोक्त निधी विहित पद्धतीने खर्च करावा.

२) प्रत्येक बाबीसाठी करण्यात आलेल्या खर्चाचे तपशीलासह विनियोग प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३) शासनाच्या प्रचलित नियमांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४) नियमानुसार ई- टेंडरींग करण्यात यावे.

५) खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयानुसार करावी.

६) जाहिरात करताना राज्याच्या जाहिरात धोरणातील तरतुदींचे व प्रचलित नियमांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७) साहित्य खरेदी केल्यास निधी पुरवठादाराच्या नांवे ECS द्वारे अदा करण्यात यावा.

८) सदर निधीतील रक्कम महामंडळ/महाटेक्स यांना वितरीत करावयाची असल्यास त्यासाठी शासनाची मान्यता आवश्यक राहील.

९) वितरीत निधीचा विकास मंडळनिहाय खर्चाचा अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपूर्वी सादर करावा.

३. सदरचा निधी जिल्हा कोषागार, नागपूर येथून काढण्यासाठी संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांचे कार्यालयातील सहाय्यक संचालक (लेखा) यांना “आहरण व संवितरण अधिकारी” व संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये उपरोक्त लेखाशीर्षाखाली निधी वितरण करण्यास विभागास अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. तथापि, वित्त विभागाच्या पत्र क्रमांक शासाउ १०.१८/प्र.क्र.४८/सा.उ. दिनांक २० एप्रिल, २०१८ अन्वये विभागाच्या अधिनस्त कार्यरत सार्वजनिक उपक्रमांना निधी वितरीत करण्यापूर्वी वित्त विभागाची सहमती घ्यावी, असे निर्देश दिले असल्याने सदर प्रकरणी निधी वितरीत करण्यास आवश्यक मान्यता वित्त विभागाने दिली असून निधी वितरणाबाबतचा शासन निर्णय स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/ २००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९ अन्वये सुधारीत केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-तीन मधील परिच्छेद २७(२)(अ) मधील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२९१५४८३७२८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAMOD DATTATRAYA TUPE

Digitally signed by PRAMOD DATTATRAYA TUPE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=25fb9d155cb4ae55ebc591d80f2e588a505237544f7c760ae3f32ae952f91058, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=750e3d339fabe697f13347901277e881075dd78c20a924b9acb3b93db44f2d61, ou=CO OPERATION MARKETING AND TEXTILE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRAMOD DATTATRAYA TUPE
Date: 2019.01.29 15:59:09 +05'30'

**( प्रमोद द.तुपे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.

३. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. अपर मुख्य सचिव (पणन), यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. प्रधान सचिव (सहकार), यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे

९. संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर

१०. संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.

११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर

१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स), मुंबई

१३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर

१४. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र १, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर

१५. सह सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

१६. उप सचिव (रेशीम), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७. व्यय-२ कार्यासन / अर्थ-१३ कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

१९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

२०. अवर सचिव, टेक्स-१(अ) / टेक्स-५ / रेशीम, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय

२१. कक्ष अधिकारी, टेक्स-१(ब)/टेक्स-२/टेक्स-४, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय

२१. निवड नस्ती ( टेक्स-३)